क्रमांक: असप-१२११/प्र.क्र.१४५/११/१४
सामान्य प्रशासन विभाग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक:- २६ डिसेंबर, २०११

पहा:- सा.प्र.वि. क्रमांक:- बीसीसी-२००१/१८८७/प्र.क्र.६४/०१/१६-ब, दि.१.४.२००८

**आदेश**

याचिका क्र.८४५२/२००४ च्या संदर्भात मा.उच्च न्यायालयाने दि.०९.०३.२००७ रोजी दिलेले आदेश व यासंदर्भात संदर्भाधीन पत्रान्वये दिलेल्या सूचना लक्षात घेता याचिका क्रमांक ८४५२/२००४ च्या अंतिम निकालाच्या अधीन राहून तसेच याचिका क्र.१३१२/१९९८, २९८२/२०००, २९८६/२००० व ४९५८/२००३ च्या अंतिम निकालाच्या अधीन राहुन खालील कक्ष अधिकाऱ्यांना अवर सचिव पदावर तदर्थ पदोन्नती देण्यात येत असून त्यांची पदस्थापना त्यांच्या नावासमोर स्तंभ-४ मध्ये दर्शविण्यात आलेल्या विभागामध्ये करण्यात येत आहे:-

| अ. क्र | अधिका-याचे नांव व प्रवर्ग | सध्याचा विभाग | अवर सचिव पदावर पदोन्नतीने पदस्थापना केलेला विभाग |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १ | श्री.सं.मु.भांडारकर (अपंग) इमाव | कृषी व पदुम विभाग | पर्यटन व सांस्कृतीक कार्य वि. |
| २ | श्री दि.य.किर (इमाव) | सामान्य प्रशासन विभाग | सामान्य प्रशासन विभाग |
| ३ | श्री. र.शं.सपकाळ (इ.मा.व.) | वित्त विभाग | सामान्य प्रशासन विभाग |
| ४ | श्रीमती न.सु.पाथरे (खुला) | ग्रामविकास व ज.सं.वि. | ग्रामविकास व ज.सं.वि. |
| ५ | श्री.प्र.द.घोगळे (खुला) | वित्त विभाग | गृह विभाग |
| ६ | श्री.ज.म.साळवी (खुला) | सा.बां.विभाग | वैद्यकीय शिक्षण व औ.द्र.वि. |
| ७ | श्रीमती शा.म.सपकाळ (खुला) | वित्त विभाग | गृह विभाग |
| ८ | श्री.वि.रा.खेडेकर (भज-ब) | सा.बां.विभाग | ग्रामविकास व ज.सं.वि. |
| ९ | श्रीमती प्र.कि.मंगुडकर (खुला) | नगर विकास विभाग | नगर विकास विभाग |

२. सदर अधिका-यांची अवर सचिव पदावरील तदर्थ पदोन्नती त्यांचेविरुध्द कोणत्याही प्रकारची विभागीय चौकशी प्रलंबित नाही, या धारणेच्या अधीन तसेच खालील अटींच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

(अ) सदर तदर्थ पदोन्नती प्रथम अकरा महिने किंवा सामान्य प्रशासन विभागाकडून निवडसूचीवरील नियमित अवर सचिव नियुक्त होईपर्यंत यापैकी जे अगोदर घडेल त्या कालावधीकरिता असेल.

(ब) प्रतिनियुक्तीवर असलेले ज्येष्ठ अधिकारी यांचे प्रत्यावर्तन झाल्यानंतर त्यांच्यासाठी अवर सचिव संवर्गात रिक्त पद उपलब्ध नसल्यास या आदेशातील कनिष्ठतम अधिकाऱ्याला पदावनत करण्याच्या अधीन सदर तदर्थ पदोन्नत्या देण्यात येत आहेत.

(क) वरील अधिका-यांची सदर पदोन्नती महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या मान्यतेच्या अधीन राहून करण्यात आली आहे.

(ड) या तदर्थ पदोन्नतीमुळे संबंधित अधिका-यांना नियमित पदोन्नतीचे म्हणजेच ज्येष्ठतेचे कोणतेही हक्क प्राप्त होणार नाहीत.

३. हे आदेश तात्काळ अंमलात येतील. पदोन्नत झालेल्या अधिका-यांना संबंधित विभागाने तात्काळ कार्यमुक्त करुन या विभागास कळवावे. तसेच पदोन्नत अधिका-यांनी पदस्थापना केलेल्या विभागात तात्काळ रुजू व्हावे. पदस्थापनेत बदल करण्यासंबंधीच्या विनंतीची दखल घेण्यात येणार नाही.

४. सदर कार्यालयीन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर प्रसिध्द करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०१११२२६०७२१००१२०००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

(म.चिं.पाटील)
सह सचिव,महाराष्ट्र शासन.

प्रति,

१. मा.मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव
२. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन
३. प्रधान सचिव (सेवा), सा.प्र.वि.,
४. अ.मु.स./प्रधान सचिव/सचिव, कृषी व पदुम विभाग/ पर्यटन व सांस्कृतीक कार्य विभाग/ ग्राम विकास व जलसंधारण विभाग/ वित्त विभाग/ गृह विभाग/ सार्वजनिक बांधकाम विभाग/ नगर विकास विभाग.
५. सह/उप सचिव/(आस्थापना) कृषी व पदुम विभाग / पर्यटन व सांस्कृतीक कार्य विभाग/ सामान्य प्रशासन विभाग/ ग्राम विकास व जलसंधारण विभाग/ वित्त विभाग/ गृह विभाग/ सार्वजनिक बांधकाम विभाग/ नगर विकास विभाग.
६. संबधित अधिकारी
७. कार्यासन १४-ब
८. निवड नस्ती.